जल जीवन मिशन अंतर्गत आदिवासी घटक राज्य हिश्श्याखाली प्राप्त निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ ए०६१ -राज्य हिस्सा)

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः जजीमि-२०२३/प्र.क्र.२९/पापु १०
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,मंत्रालय
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: ९ मे,२०२३

वाचा-

१.शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि -२०१९/ प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि २०२१/ प्र.क्र.१९२/ पापु १०, दि.०५.०९.२०२२
३. केंद्र शासनाचे आदेश क्र.W-११०२०/१९७/२०१५-Water-I/४०,दि.०९.०१.२०२३
४. शासन निर्णय, समक्रमांक दि.२३.०२.२०२३
५. केंद्र शासनाचे आदेश क्र.W-११०२०/१९७/२०१५-Water-I/७६,दि.२७.०३.२०२३
६. शासन निर्णय,समक्रमांक दि.३१.०३.२०२३
७. शासन निर्णय, समक्रमांक दि.३१.०३.२०२३
८. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी २०२३/ प्र.क्र.१०/कार्यासन -६, दि.०८.०५.२०२३

प्रस्तावना-

संदर्भिय क्र.१ दि.०४.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन अंतर्गत केंद्र व राज्य वित्तीय आकृतीबंध ५०:५० असून आदिवासी घटक कार्यक्रमाकरीता केंद्र शासनाकडून निधी उपलब्ध करुन दिला जातो. जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षात आदिवासी घटक कार्यक्रमाकरीता केंद्र शासनाने संदर्भिय क्र.३ दि.०९.०१.२०२३ रोजीच्या आदेशान्वये रु.२३७.६८४१ कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला होता. त्यानुसार जल जीवन मिशन आदिवासी घटकांतर्गत समरुप राज्य हिश्श्याकरीता संदर्भिय क्र.४ दि.२३.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करण्यात आले आहे.

केंद्र शासनाने संदर्भिय क्र.५ दि.२७.०३.२०२३ रोजीच्या आदेशान्वये जल जीवन मिशन आदिवासी घटक कार्यक्रमाकरीता रु.२७६.६९४५ कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. त्या समरुप राज्य हिश्श्याकरीता उपलब्ध तरतुदीमधून रु.२३७.६८१६ कोटी इतका निधी संदर्भिय क्र.६ च्या शासन निर्णयान्वये राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करण्यात आला आहे. उर्वरित रु. ३९.०१२९ कोटी निधीकरीता पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करुन देण्याची आदिवासी विकास विभागास विनंती करण्यात आली होती. त्यानुसार आदिवासी विकास विभागाने वित्तीय वर्ष २०२२-२०२३ मध्ये रु.३९.०१२९ कोटी निधी पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन दिला होता. सदरचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला संदर्भिय क्र.७ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला होता. तथापि, हा निधी तांत्रिक कारणास्तव आहरित करता न आल्याने वित्तीय वर्ष २०२३-२०२४ च्या आदिवासी घटक कार्यक्रम राज्य हिश्श्याखालील अर्थसंकल्पित रु.३०० कोटी तरतुदीतुन उपलब्ध करुन देण्याची आदिवासी विकास विभागामार्फत वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. आदिवासी विकास विभागाने सन २०२२-२०२३ वित्तीय वर्षातील तफावतीचा निधी म्हणून (Shortfall) रु.३९.०१२९ कोटी निधी संदर्भिय क्र.८ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिला आहे. हा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला ESCROW ACCOUNT मध्ये उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षामध्ये आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र. टी-५, लेखाशीर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ७९६, जन जाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (१०) जल जीवन मिशन (राज्य हिस्सा) (५०टक्के) (कार्यक्रम) मधील ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) लेखाशीर्ष (२२१५ ए०६१) या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ वित्तीय वर्षातील तफावतीचा निधी म्हणून (Shortfall) रु.३९.०१२९ कोटी (अक्षरी-रु. एकोणचाळीस कोटी एक लक्ष एकोणतीस हजार फक्त) इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खात्यामध्ये (ESCROW Account) वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर निधी तात्काळ राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक ९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

०४. जल जीवन मिशन आदिवासी घटक कार्यक्रमाखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षनिहाय/ उपलेखाशीर्षानिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ.माहितीसह आदिवासी विकास विभागास व या विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

०५. हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.सं.क्र.४७५-२३ व्यय १४ दि.२६.०४.२०२३ अन्वये आदिवासी विकास विभागामार्फत प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०२१७२७०१९०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD SWAMI

Digitally signed by PRASAD SWAMI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=aaf002dc55f52d8292cd1b600e0a80b7cf51b57c6f840c909c76407640c157f4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D84D41A9008354A0AF034B551119753B7D1C967B179AC7110EAA1867A160049, cn=PRASAD SWAMI
Date: 2023.05.09 17:23:34 +05'30'

**(प्रसाद स्वामी)**
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**
१. नियंत्रक अधिकारी तथा उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२.आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन, वित्त विभाग व आदिवासी विकास विभाग मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन पापु १०